**मंत्रालय मुख्य इमारतीमधील तिसऱ्या मजल्यावरील राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र (एन.आय.सी.) या संस्थेच्या कार्यालयास अतिरिक्त जागा वाटप करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. शाकाजा-११२२/प्र.क्र.५५/२०२२/२२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २० फेब्रुवारी, २०२३

**संदर्भ :** शासन निर्णय, क्र.शाकाजा-११२२/प्र.क्र.५५/२०२२/२२, दिनांक ७.९.२०२२

**प्रस्तावना :-**

मंत्रालयीन प्रशासन विभाग एकाच मजल्यावर एकत्रित आणण्याच्या दृष्टीकोनातून मंत्रालय मुख्य इमारतीमधील तिसऱ्या मजल्यावरील राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र (एन.आय.सी.) या संस्थेचे कार्यालय स्थलांतरीत करुन सदर कार्यालयास संदर्भाधीन शासन निर्णयान्वये नविन प्रशासन भवन इमारतीमधील ११ वा मजला, पूर्व बाजू येथील माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या ताब्यातील जागेच्या मुख्य प्रवेशद्वाराच्या उजव्या बाजूकडील ३१० चौ.फूट जागा वाटप करण्यात आली. सदर जागा कामकाजाच्या दृष्टीने अपुरी पडत असल्यामुळे राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र (एन.आय.सी.) या संस्थेच्या कार्यालयास माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या ताब्यातील नविन प्रशासन भवन इमारतीमधील ११ वा मजला, पूर्व बाजू येथील प्रवेशद्वाराच्या डाव्या बाजू कडील २३८ चौ.फूट जागा वाटप करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :-**

मंत्रालय मुख्य इमारतीमधील तिसऱ्या मजल्यावरील राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र (एन.आय.सी.) या संस्थेच्या कार्यालयास नविन प्रशासन भवन इमारतीमधील ११ वा मजला, पूर्व बाजू येथील माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या ताब्यातील जागेच्या मुख्य प्रवेशद्वाराच्या डाव्या बाजूकडील २३८ चौ.फूट जागा वाटप करण्यात येत आहे. अशाप्रकारे राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र (एन.आय.सी.) या संस्थेच्या कार्यालयास नविन प्रशासन भवन इमारतीमधील ११ वा मजला, पूर्व बाजू येथे एकूण ५४८ चौ.फूट जागा वाटप करण्यात येत आहे.

२. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, मुंबई यांनी उपरोक्त जागेचा ताबा संबंधितांना दयावा व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२२०१४२३४७०९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by BHAGURE DEVIDAS SANDUJI
Date: 2023.02.20 14:27:48 +05'30'

**( दे. सां. भगुरे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सर्व सन्माननीय विधानसभा/परिषद व संसद सदस्य
२. मा.सभापतींचे सचिव/मा.अध्यक्षांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिवांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिवांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

६. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
७. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. वरीष्ठ तांत्रिक संचालक, नवीन प्रशासन भवन, ११ वा मजला, मादाम कामा रोड, मुंबई-४०००३२.
१२. संचालक, महिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१३. उप सचिव (का.२२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, २ रा मजला, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-०१.
१५. उप अभियंता, दक्षिण उपविभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, एम.टी.डी.सी.समोर, मुंबई.
१६. शाखा अभियंता (सा.बां.) बंगलो, नविन प्रशासन भवन, तळमजला, मंत्रालय, मुंबई-३२
१७. निवडनस्ती.